**व्दारकाशंकर विद्याप्रसारक मंडळ आंबापिंप्री, जि.जळगाव संचालित श्री.संत सोमगीर माध्यमिक विद्यालय, भिलाली जि. जळगाव या शाळेचे श्री.स्वामी समर्थ शैक्षणिक व सांस्कृतिक मंडळ, भादली (खु), जि. जळगांव या संस्थेस व्यवस्थापन हस्तांतराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र-१३१८/प्र.क्र.२२३/१८/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ११ मार्च, २०२४

<u>**वाचा**</u> : शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक माशाह २०११/(२१०/११)/माशि-३ दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२

<u>**संदर्भ**</u> : **१**) रिट याचिका क्र.४०९७/२०१४ मधील मा.उच्च न्यायालय, मुंबई ( खंडपीठ औरंगाबाद) यांचे दि.११.१०.२०१८ रोजीचे आदेश

**२)**विभागीय शिक्षण उपसंचालक, नाशिक विभाग, नाशिक यांचे जा.क्र./शिउसं/नावि/माध्य-४/व्य.हस्तां/२०१९/२९५७/६१, दि.२३.०१.२०१९ चे पत्र.

**३)** शिक्षणाधिकारी (माध्य) अति.कार्या, जिल्हा परिषद, जळगाव यांचे जा.क्र.जजिप/शिक्षण/माध्य/न्यायसेल/२०२४/६१, दि.०९/०१/२०२४

<u>**प्रस्तावना :**</u>

व्दारकाशंकर विद्याप्रसारक मंडळ आंबापिंप्री ता. पारोळा, जि.जळगाव संचालित श्री.संत सोमगीर माध्यमिक विद्यालय, भिलाली, ता.पारोळा, जि. जळगाव या मराठी माध्यमाच्या अनुदानित माध्यमिक (इ.५ वी ते १० वी)शाळेचे, श्री.स्वामी समर्थ शैक्षणिक व सांस्कृतिक मंडळ, भादली (खु.) ता.जि. जळगांव या संस्थेस व्यवस्थापन हस्तांतर करणेबाबत ठराव करूनही नंतर सदरचा ठराव मागे घेतल्याने अध्यक्ष, श्री. स्वामी समर्थ शैक्षणिक व सांस्कृतिक मंडळ, भादली (खु.) ता.जि. जळगांव यांनी मा. मुंबई उच्च न्यायालय (औरंगाबाद खंडपीठ) येथे रिट याचिका क्र.४०९७/२०१४ दाखल केली होती. त्याबाबत मा.उच्च न्यायालयाने संदर्भ १ अन्वये दिलेल्या आदेशांच्या अनुषंगाने शिक्षण उपसंचालक, नाशिक विभाग, नाशिक यांनी दि.१७.०१.२०१९ रोजी सुनावणी आयोजित केली होती व क्र.२ अन्वये शासनास प्रस्ताव सादर केला होता. मा. उच्च न्यायालयाच्या आदेशांनुसार संदर्भिय प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

<u>**शासन निर्णय :**</u>

व्दारकाशंकर विद्याप्रसारक मंडळ आंबापिंप्री ता. पारोळा, जि.जळगांव संचालित श्री.संत सोमगीर माध्यमिक विद्यालय, भिलाली, ता.पारोळा, जि. जळगाव या मराठी माध्यमाच्या अनुदानित माध्यमिक (इ.५ वी ते १० वी)शाळेचे, श्री.स्वामी समर्थ शैक्षणिक व सांस्कृतिक मंडळ, भादली (खु.) ता.जि. जळगांव या संस्थेस व्यवस्थापन हस्तांतर करण्यास खाली नमूद अटी व शर्तीवर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

(१) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही.

(२) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेच्या बाबतीत शासन परवानगीच्या/मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाहीत याची खबरदारी घेण्यात यावी.

(३) शासनाकडून शाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेत्तर अनुदान, विद्यार्थी इ. बाबत वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ. चे पालन करणे नवीन संस्थेस बंधनकारक राहील.

(४) सदर व्यवस्थापन बदल, शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्रमांक: माशाह २०११/(२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२ मध्ये विहित केलेल्या नियमानुसार व कार्यपद्धतीनुसार अंमलात येईल.

(५) सदर व्यवस्थापन बदलासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे नव्याने तक्रारी प्राप्त झाल्यास किंवा व्यवस्थापन बदला संदर्भातील अटी व शर्तीचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास किंवा व्यवस्थापन बदलापूर्वीच्या संस्थेतील कार्यरत शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या सेवाशर्तींचा नवीन संस्थेद्वारा भंग झाल्यास, हस्तांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

(६) संदर्भिय व्यवस्थापन हस्तांतराबाबत कोणतेही प्रकरण न्यायप्रविष्ठ असल्यास अथवा भविष्यात उद्भवल्यास त्यातील निर्णय बंधनकारक असेल याबाबत हस्तांतर स्वीकारणाऱ्या संस्थेकडून बंधपत्र घेण्यात यावे.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, नाशिक विभाग, नाशिक यांनी सर्व बाबी तपासून व वरील अटी/शर्ती व्यतिरिक्त आवश्यक अटींचा समावेश करून, शाळेचे व्यवस्थापन बदलाबाबत पुढील कार्यवाही १५ दिवसांत करावी व त्याबाबत शासनास अवगत करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१११८०६३८४७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2024.03.11 18:17:20 +05'30'

( प्रविण मुंढे)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१) शिक्षण संचालक(माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, नाशिक विभाग, नाशिक.
३) शिक्षणाधिकारी (माध्यमिक व उच्च माध्यमिक), जिल्हा परिषद, जळगांव
४) अध्यक्ष/ सचिव, व्दारकाशंकर विद्याप्रसारक मंडळ आंबापिंप्री, जि.जळगांव
५) अध्यक्ष/ सचिव, स्वामी समर्थ शैक्षणिक व सांस्कृतिक मंडळ, भादली (खु.) ता.जि. जळगांव.
६) निवडनस्ती (एसएम-१).